**सहाय्यक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरणातील प्रतिनियुक्ती बाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र. नियुक्ती-१११८/११८१/प्र.क्र.९१/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३१ जूलै , २०१८.

**प्रस्तावना :-**

पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाची स्थापना महाराष्ट्र महानगर प्रदेश विकास अधिनियम २०१६ नुसार झाली आहे. पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम, १९६६ नुसार प्रारूप नगर रचना योजना तयार करण्याची कार्यवाही सुरु केली आहे. सदर अधिनियमातील तरतुदीनुसार लवाद म्हणून नेमणूक करण्याकरिता सहाय्यक संचालक नगर रचना संवर्गातील अधिकाऱ्याची प्राधिकरणात नियुक्ती करण्याची विनंती पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने केली होती. सदर विनंतीच्या अनुषंगाने पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरणातील सहाय्यक संचालक नगर रचना हे पद नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापेनवरील सहाय्यक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांमधून बदलीने/प्रतिनियुक्तीने भरण्याची बाब शासनाच्या विचारीधीन होती. सदर पदावरील सहाय्यक संचालक नगर रचना बदली/प्रतिनियुक्तीबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) (दोन) व कलम ४ (५) मधील तरतुदींनुसार तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील परिशिष्ट-तीन, नियम ४० (१) (२) (३) (४) व परिशिष्ट-दोन मधील अटी व शर्तीनुसार व प्रशासकीय कारणास्तव खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आल्यानुसार सहाय्यक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांची बदली करून प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्या कार्यरत असलेले कार्यालय | प्रतिनियुक्ती नंतरचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | श्री. ध. शि. खोत | सहाय्यक संचालक, नगर रचना, कोल्हापूर महानगर पालिका (शा.आ) , कोल्हापूर | सहाय्यक संचालक, नगर रचना, पुणे महानर प्रदेश विकास प्राधिकरण , पुणे ( प्र.नि.) |

०२. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी वरील अधिकाऱ्यांना बदलीने/ प्रतिनियुक्तीने पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्याकरिता आवश्यक ते कार्यकारी आदेश तातडीने निर्गमित करण्याची कार्यवाही करावी.

०३. या आदेशान्वये बदलीने / प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे प्रतिनियुक्तीबाबतचे कार्यकारी आदेश प्राप्त होताच प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी तातडीने रुजू व्हावे.

०४. उपरोक्त अधिकाऱ्यांची सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने बदलीने/प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत असल्याने त्या अधिकाऱ्यांना नियमानुसार अनुज्ञेय पदग्रहण अवधी व संयुक्त बदली अनुदान मंजूर करण्यात यावे.

०५. सदरहू आदेशान्वये बदली/ प्रदिनियुक्तीने पदस्थापना करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा राजकीय दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न केल्यास त्याची संबंधित अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालात नोंद घेण्यात येईल. तसेच राजकीय दबावाबाबतची कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम ३ (३) व २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची नोंद घेण्यात यावी.

०६. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी, सदर प्रतिनियुतीच्या अनुषंगाने रिक्त होणाऱ्या पदाचा अतिरिक्त कार्यभार त्याच अथवा नजिकच्या कार्यालयातील समकक्ष दर्जाच्या अधिकाऱ्यांकडे अथवा बदली होणाऱ्या अधिकाऱ्याच्या संवर्गास कनिष्ठ असलेल्या संवर्गामधील त्याच कार्यालयातील ज्येष्ठ अधिकाऱ्याकडे सोपविण्यात यावा. परंतु, कोणत्याही परिस्थितीत बदली होणाऱ्या अधिकाऱ्याकडे त्याच्या बदलीमुळे रिक्त होणाऱ्या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविला जाणार नाही, याची दक्षता घ्यावी.

०७. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१८०७३११७१७००६१२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vishnu Shripati Patil

Digitally signed by Vishnu Shripati Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=21ebe4508a75a767041512feeaa6b8f2d5bc8caf857fe02cd29ce4bbb772da09, serialNumber=f8a0fc598f692587efafe9bd62df9e449fdf81c803c27adf1782c97c76ebcba5, cn=Vishnu Shripati Patil
Date: 2018.08.02 16:46:31 +05'30'

**( विष्णू पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

श्री. ----------------------------- ,सहाय्यक संचालक, नगर रचना, यांना,
(संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत.)

**प्रत :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.

२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.

३. महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.

४. महालेखापाल (लेखा परिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.

५. मा. मुख्य मंत्र्याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

६. मा. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (न.वि.-२) मंत्रालय मुंबई

७. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१. **(३-प्रती)**

८. महानगर आयुक्त पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण , पुणे

९. जिल्हाधिकारी, पुणे/ कोल्हापूर

१०. आयुक्त, कोल्हापूर महानगरपालिका, कोल्हापूर .

११. सर्व सह संचालक, नगर रचना------------------------.

१२. सह सचिव / उप सचिव (नवि-१३/१९), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१३. उप सचिव (नवि-७/२७), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१४. कार्यासन अधिकारी ( न.वि.-७) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१५. निवड नस्ती न,वि-२७ नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई